“राष्ट्रीय बांबू अभियान” या योजनेसाठी सन २०१६-१७ करिता निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- साववि -२०१५/प्र.क्र. ११२/फ-११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १३ जानेवारी, २०१७.

**वाचा -** १) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक : -साववि-२०१५/प्र.क्र. ११२/फ-११, दि. १४.०१.२०१६.
२) शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक : -अर्थसं-२०१६/प्र.क्र. ८९/अर्थ-३, दि. २०.०४.२०१६.
३) बांबू विकास मिशनचे मिशन संचालक आणि प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक D-३/NBM/C.R. No. ५१/१६-१७/८२९/१६-१७, दि. १९.०७.२०१६

**प्रस्तावना -**

केंद्र शासनाने देशातील वनक्षेत्र व वनेत्तर क्षेत्रात लागवड होणाऱ्या बांबूच्या सर्वंकष विकासासाठी राष्ट्रीय बांबू अभियान ( National Bamboo Mission ) जाहीर केले आहे. सदर योजना राज्यात सन २००७-०८ पासून सुरु करण्यात आली असून, या योजनेची अंमलबजावणी वन विभाग, सामाजिक वनीकरण विभाग, फलोत्पादन विभाग यांचेकडून करण्यात येते. बांबू विकास मिशनचे मिशन संचालक म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची नियुक्ती करण्यात आलेली असून ते या योजनेचे नोडल अधिकारी आहेत.

सदर योजना पूर्वी १००% केंद्र पुरस्कृत योजना म्हणून राबविण्यात येत होती. आता केंद्र शासनाच्या शिफारशीनुसार सन २०१५-१६ पासून ६०% केंद्र हिस्सा व ४०% राज्य हिस्स्यातून सदर योजना राबविण्याचे ठरविण्यात आले आहे.

राष्ट्रीय बांबू अभियान या योजनेतंर्गत सन २०१५-१६ मध्ये रु. ६०.३७ लक्ष इतका राज्य शासनाच्या हिस्स्याचा निधी अखर्चित राहिलेला आहे. सन २०१६-१७ च्या मंजूर निधीतून रु. ११.४५ लक्ष इतका निधी राष्ट्रीय बांबू अभियानांतर्गत केलेल्या लागवडीची देखभाल करण्यासाठी वितरीत करण्यात यावा अशी विनंती बांबू विकास मिशनचे संचालक आणि प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण यांचेकडून संदर्भ क्रमांक ३ वरील पत्रान्वये करण्यात आली होती.

या अनुषंगाने राष्ट्रीय बांबू अभियान या योजनेंतर्गत सन २०१६-१७ करिता मंजूर करण्यात आलेल्या रु. ११४.०० लक्ष इतक्या निधीपैकी रु. ११.४५ लक्ष इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सामाजिक वनीकरण विभागाकडून राबविण्यात येत असलेली “राष्ट्रीय बांबू अभियान” या योजनेंतर्गत करण्यात आलेल्या लागवडीची देखभाल करण्यासाठी सन २०१६-१७ करिता रु. ११.४५ लक्ष इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी साठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक ( वनबल प्रमुख ), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. मंजूर निधीचे जिल्हानिहाय वाटप करण्यास महासंचालक,सामाजिक वनीकरण यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. या योजनेतंर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता

घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

३. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक ( वनबल प्रमुख ), महाराष्ट्र राज्य, नागपूर आणि प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या मार्फत व्हावे.

४. सदर योजनेतंर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ मध्ये मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा :-
"मागणी क्र.सी-७, २४०६,वनीकरण व वन्यजीवन,-(योजनांतर्गत)०१ वनीकरण,१०२ सामाजिक व क्षेत्रीय वनीकरण,(११) (२२) राष्ट्रीय बांबू अभियान (४० % राज्य हिस्सा ) (२४०६ A ००२४) ३३ - अर्थसहाय्य".

५. सदर शासन निर्णय संदर्भ क्र. २ येथे नमूद वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक : - अर्थसं-२०१६/ प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. २०.०४.२०१६ मधील सूचनांनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारांन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०११३१६४८५९७४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.01.13 16:56:57 +05'30'

**( डी. एल. थोरात )**
**सह सचिव, (वने)**

**प्रत,**

१. मा. मुख्य सचिव.
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
३. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग.
४. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग.
५. प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय
६. सचिव, (लाभक्षेत्र विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय.
७. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग.
८. सचिव (वने), महसूल व वन विभाग.
९. मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
१०. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ),नागपूर.
११. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१२. प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१३. मुख्य वनसंरक्षक व उप महासंचालक, सामाजिक वनीकरण वृत्त, कोकण ठाणे, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर .
१४. सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग, (सर्व जिल्हे)
१५. महालेखापाल, (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
१६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई -४०० ०३२.
१८. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
१९. वित्त विभाग, व्यय-०९, अर्थसंकल्प- ०६ मंत्रालय, मुंबई-३२
२०. कार्यासन अधिकारी, फ-२,फ-७,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२१. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२२. सह सचिव/उप सचिव/अवर सचिव (सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२३. निवडनस्ती/फ-११.